**इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील (कनिष्ठ महाविद्यालय) मान्यताप्राप्त कर्मचाऱ्यांचे ऑनलाईन वेतन अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र.विभशा-२०२०/प्र.क्र.२५१/विजाभज-२**
१ ला मजला, विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक- १३ मार्च, २०२०.

<u>प्रस्तावना:-</u>

मा.मंत्रीमंडळाच्या निर्णयानुसार तसेच मा.मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेने या विभागाच्या कार्यरत माध्यमिक आश्रमशाळांना श्रेणीवाढ देऊन १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळा अनुदानित तत्वावर चालविण्यात येत आहेत.

२. कार्यरत असलेल्या १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळेपैकी शासन निर्णय दि.८/३/२०१९ अन्वये ९४ उच्च माध्यमिक आश्रमशाळांना तसेच शासन निर्णय दि.१७/९/२०१९ अन्वये ४७ उच्च माध्यमिक आश्रमशाळांना वित्त विभागाच्या मान्यतेने निकषपात्र ठरविण्यात आलेले आहे. तसेच त्यातील कर्मचाऱ्यांना ऑनलाईन वेतन अदा करावे असेही वित्त विभागाने आदेशित केले आहे.

३. विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये निर्माण करावयाच्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या पदांबाबत दि.२६/६/२००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सूचना दिलेल्या आहेत.

४. मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठात दाखल याचिका क्र.५९९१/२०१६ मध्ये मा.न्यायालयालये दि.११/१०/२०१८ रोजीच्या निर्णयानुसार विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांचे सद्यस्थितीत ऑफलाईन वेतन अदा करण्यात येत आहे. यापुढे कर्मचाऱ्यांचे वेतन थेट त्यांच्या बँक खात्यामध्ये ऑनलाईन पध्दतीने अदा करावे असे मा.न्यायालयाने आदेशीत केलेले आहे. सदर कार्यवाही अद्यापही झाली नसल्याने काही कर्मचाऱ्यांनी मा.न्यायालयात अवमान याचिका देखील दाखल केलेल्या आहेत.

५. सद्यस्थितीत विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांचे नियमित वेतन ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यात येत असून वरील परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद केलेल्या ९४ व ४७ उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांचे वेतन ऑनलाईन पध्दतीने करण्याबाबत कालमर्यादेत कार्यवाही करण्याबाबत वित्त विभागाने सूचना दिलेल्या आहेत.

६. उपरोक्त बाबी विचारात घेता याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबी विचारात घेता शासन निर्णय दि.८/३/२०१९ व दि.१७/९/२०१९ सोबतच्या यादीमधील उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांची नांवे सेवार्थ प्रणालीत समाविष्ठ करुन त्यांचे ऑनलाईन वेतन अदा करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

२. विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळा या कार्यरत असलेल्या माध्यमिक आश्रमशाळांना श्रेणीवाढ देऊन मंजूर केलेल्या असल्या तरी सदरहू सेवार्थ प्रणालीचे कामकाजासाठी उच्च माध्यमिक आश्रमशाळा या स्वतंत्र समजण्यात येऊन त्यांना स्वतंत्र डि.डि.ओ.कोड घेऊन त्यावर कर्मचाऱ्यांची नांवे सेवार्थ प्रणालीत समाविष्ठ करण्यात यावी.

३. सेवार्थ प्रणालीत नावे समाविष्ठ करण्याकरिता खालील अटींची पूर्तता होणे आवश्यक असेल.

१) ज्या कर्मचाऱ्याचे नांव समाविष्ठ करावयाचे आहे त्या कर्मचाऱ्यांच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळेची चालू वर्षीची संचमान्यता झाली असली पाहिजे.

२) संचमान्यतेमध्ये कर्मचाऱ्यांची पदे मान्य झालेली असली पाहिजे.

३) कर्मचाऱ्याची नियुक्ती नियमाप्रमाणे तसेच शासन निर्णय २६/६/२००८ मध्ये विहित केलेल्या पदमर्यादेत (विषयनिहाय शिक्षक) असावी.

४) ज्या कर्मचाऱ्याला नियमाप्रमाणे ऑफलाईन वेतन सध्या सुरु आहे फक्त त्यांचीच नावे ऑनलाईनमध्ये समाविष्ठ करता येईल.

५) ज्या कर्मचाऱ्याचे नांव समाविष्ठ करावयाचे आहे त्यांच्या पदांना शासन निर्णय दि.१५/१/२०१८ नुसार गठीत प्रादेशिक समितीची मान्यता असावी.

६) शासन निर्णय दि.१५/१/२०१८ पूर्वी ज्या कर्मचाऱ्यांना मान्यता दिलेल्या आहेत त्यांचे मान्यतेच्या प्रस्तावाची पुन्हा सदर शासन निर्णयातील प्रादेशिक समितीने पडताळणी करुन नियमात बसत असतील तर नावे ऑनलाईन वेतनासाठी समाविष्ठ करावेत. तथापि ज्या कर्मचाऱ्यांना शासनस्तरावरुन मान्यता प्रदान करण्यात आलेल्या आहेत त्यांचे बाबतीत पुन्हा प्रादेशिक समितीसमोर प्रस्ताव ठेवण्याची आवश्यकता नाही.

७) शासन निर्णय दि.२६/६/२००८ मध्ये विहित केलेल्या पदमर्यादेत नसलेले, शासन निर्णय दि.१५/१/२०१८ नुसार गठीत प्रादेशिक समितीने वैयक्तिक मान्यता न दिलेल्या किंवा शासनस्तरावरुन मान्यता न दिलेल्या कर्मचाऱ्यांचे वेतन ऑनलाईन पध्दतीप्रमाणे देण्यात येऊ नये. काही कर्मचाऱ्यांच्या प्रकरणात असे वेतन देणे गरजेचे असल्यास अशा कर्मचाऱ्यांचे प्रस्ताव प्रशासकीय विभागाकडे योग्य मार्गदर्शनासाठी पाठवावे.

४. शासन निर्णय दि.८/३/२०१९ व दि.१७/९/२०१९ नुसार मान्यताप्राप्त उच्च माध्यमिक आश्रमशाळांना नवीन डी.डी.ओ.कोड घेण्याचे प्रस्ताव सदर आश्रमशाळेमध्ये शासन निर्णय दि.२६/६/२००८ प्रमाणे मंजूर झालेल्या पदावर रितसर मान्यता प्राप्त झालेले शिक्षक / शिक्षकेतर कर्मचारी (ज्यांचे या पदावर ऑफलाईन वेतन सुरु आहे) आश्रमशाळानिहाय/पदनिहाय / कर्मचाऱ्यांच्या नावासह प्रस्ताव सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये विनाविलंब सादर करावेत.

५. कर्मचाऱ्यांना ऑनलाईन पध्दतीने वेतन अदा करण्याची प्रक्रिया राबवितांना ज्या-ज्या प्रकरणांमध्ये वेतन अदा करण्यास काही कारणाने विलंब होत असल्यास अशा प्रकरणांमध्ये सदरहू कर्मचाऱ्यांचे जोपर्यंत ऑनलाईन पध्दतीने वेतन अदा होत नाही तोपर्यंत ऑफलाईन पध्दतीप्रमाणे वेतन अदा करणे चालू ठेवावे. कोणत्याही परिस्थितीत या कारणामुळे वेतन थकीत राहणार नाही याची दक्षता घ्यावी.

६. क्षेत्रीय कार्यालयांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची तपासणी करुन डी.डी.ओ.कोड घेण्याबाबत निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे. सदर समितीने प्राप्त प्रस्तावांची तपासणी करुन अहवाल सादर करावा.

| अ.क्र. | अधिकारी/कर्मचारी | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १. | सह सचिव (श्री.भा.र.गावित), इतर मागास बहुजन कल्याण विभाग | अध्यक्ष |
| २. | विधी अधिकारी (कंत्राटी) (श्री.प्रभाकर परदेशी) इतर मागास बहुजन कल्याण विभाग | सदस्य |
| ३. | कक्ष अधिकारी (विजाभज-२) (श्री.कि.आ.फुलझेले) इतर मागास बहुजन कल्याण विभाग | सदस्य |
| ४. | सहाय्यक कक्ष अधिकारी (विजाभज-२) (श्री.प्रितम चौगुले) इतर मागास बहुजन कल्याण विभाग | सदस्य सचिव |

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००३१३१७५२१३९६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2020.03.13 17:56:02 +05'30'

**(भा.र.गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.प्र.सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.
४. मा.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
५. मा.उपसचिव, इतर मागास बहुजन कल्याण, यांचे स्वीय सहाय्यक
६. मा.प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व)
७. मा.सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व)
८. निवडनस्ती (विजाभज-२)

इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र.विभशा-२०२०/प्र.क्र.२५१/विजाभज-२, दिनांक १३/०३/२०२० रोजीचे सहपत्र

(उच्च माध्यमिक आश्रमशाळांना नवीन डी.डी.ओ.कोड घेण्यासाठी प्रस्ताव सादर करतांना जोडावयाचे प्रपत्र)

| अ. क्र. | प्रादेशिक विभाग | जिल्हा | संस्थेचे नांव | उच्च माध्यमिक आश्रमशाळेचे नांव | आश्रमशाळा मान्यतेचा आदेश क्र. व दिनांक | विद्याशाखा | पदाचे नांव | पदावर मान्यता (सध्या ऑफलाईन वेतन घेत असलेले) शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्याचे नांव | कर्मचाऱ्याच्या नियुक्तीचा दिनांक | वेतनश्रेणी | मान्यताप्राप्त शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्याच्या प्रादेशिक समितीची/ शासनाची मान्यतेचा आदेश क्र. व दिनांक | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | | | | |

स्वाक्षरी/-
प्रादेशिक उपायुक्त/सहाय्यक आयुक्त